**कायम विसावा गृह, बिर्सी (२२३५ २८९६) या योजनेसाठी सन २०२४-२०२५ करीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. बिर्सी-२०२४/ प्र.क्र.५५/ का-९**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक-२९/०३/२०२५

**वाचा-**१) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३ दि.१ एप्रिल, २०२४

**प्रस्तावणा :-**

कायम विसावा गृह, बिर्सी या योजनेचा भारत पाकिस्तान युद्धामुळे निर्वासित झालेल्या बांग्लादेशातील नागरिकांना अन्न, वस्त्र, निवारा आणि पुनर्वसन भत्ता ई. सुविधा पुरवून त्यांची देखभाल व पुनर्वसन करणे हा मुळ उद्देश आहे. सदर छावणी १९७० पासून अस्तित्वात असून छावनीमध्ये १९७० मध्ये बांग्लादेशातून भारतात आलेले निर्वासित आहेत. या निर्वासिताना जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, गोंदिया यांचेमार्फत अन्नधान्य, निर्वाह भत्ता व कापड पुरविण्यात येत आहे.

**शासन निर्णय**

महिला व बाल विकास विभागांतर्गत "कायम विसावा गृह, बिर्सी "या योजनेस सन २०२४-२५ या अर्थसंकल्पीय वर्षात मागणी क्र. एक्स-१, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, १०४- वृध्द, विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण, (०१)(०३) कायम विसावा गृह, बिर्सी (२२३५-२८९६), या लेखाशीर्षाखाली ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टासाठी अर्थसंकल्पित रु.२,००,०००/- (अक्षरी-रु. दोन लाख फक्त) पैकी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वर उपलब्ध असलेला रु.१,१०,०००/- (अक्षरी-रु. एक लाख दहा हजार फक्त) इतका निधी या शासन निर्णयाद्वारे आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर निधी वितरीत करताना वित्त विभागाच्या दि.१/४/२०२४ रोजीच्या शासन परिपत्रका सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.८ मध्ये नमूद अटी/शर्तीची पुर्तता करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर निधी महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तीकेमध्ये उल्लेख केलेल्या अटी व शर्तीचे पालन करुन खर्च करण्यात यावा. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे राहतील. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याची दक्षता घ्यावी व खर्च झालेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरीत सादर करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ अनुक्रमे १२७/१४७२, दि. २०/०३/२०२५ व क्र. ११८/व्यय-६, दि. २७/०३/२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२९१४४५२१४२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NEELIMA PRAMOD CHAUDHARI

Digitally signed by NEELIMA PRAMOD CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2d492c577d5f8956310c91dc01ffb9a071206c77d27a3be4e52d7c1b29fcf933, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AA21FB5959CBBFBF3AA97101D99F5D77D2333AE1AC39229E507A3EBF86EC6CD4, cn=NEELIMA PRAMOD CHAUDHARI
Date: 2025.03.29 14:46:15 +05'30'

**(नीलिमा चौधरी)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया (आयुक्तालयामार्फत)
७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना तात्काळ वितरीत करण्यात यावा.
९. निवड नस्ती (का-९)